**श्रीसंत गजानन महाराज समाधी शताब्दी महोत्सव**
**<u>शेगांव तीर्थक्षेत्र विकास आराखडा</u>**
**स्वीय प्रपंजी खात्यातील अखर्चीत निधी खर्च करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## नियोजन विभाग
### शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०१३/प्र.क्र.१२/१४४४

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
तारीख: २८ जुलै, २०१५.

**<u>वाचा -</u>**

१) **शासन निर्णय क्रमांकः तिक्षेवि-२००९/प्र.क्र.३२/का.१४४४ दि. २६ ऑक्टोबर, २००९**
२) **शासन निर्णय क्रमांकः तिक्षेवि-२०१०/प्र.क्र.८०/का.१४४४ दि. ८ मार्च, २०१०**
३) **शासन निर्णय क्रमांकः तिक्षेवि-२०१०/प्र.क्र.२६/का.१४४४ दि. २८ मार्च, २०१०**
४) **शासन निर्णय क्रमांकः तिक्षेवि-२०१२/प्र.क्र.२४/का.१४४४ दि. २९ ऑक्टोबर, २०१४**
५) **शासन निर्णय क्रमांकः तिक्षेवि-२०१३/प्र.क्र.१२/का.१४४४ दि. ३० जानेवारी, २०१५**
६) **विभागीय आयुक्त, अमरावती यांचे दिनांक १५ जुलै, २०१५ चे पत्र.**

**<u>प्रस्तावना -</u>**

श्रीसंत गजानन महाराज समाधी शताब्दी महोत्सवानिमित्त शेगांव येथे तीर्थक्षेत्री मूलभूत सुविधा निर्माण करण्यासाठी, शासनामार्फत उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी कोषागारातून आहरित करुन विभागीय आयुक्त, अमरावती यांच्या नांवे स्वीय प्रपंजी खात्यामध्ये जमा करण्यास अनुक्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर स्वीय प्रपंजी खात्यास अनुक्रमांक ५ येथील शासन निर्णयान्वये दिनांक ३० जून, २०१६ पर्यंत मुदतवाढ दिली आहे. विभागीय आयुक्त, अमरावती यांनी विनंती केल्यानुसार मार्च, २०१५ अखेरचा अखर्चित निधी खर्च करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

श्रीसंत गजानन महाराज समाधी शताब्दी महोत्सव शेगांव तीर्थक्षेत्र विकास आराखड्याकरिता विभागीय आयुक्त, अमरावती यांच्या नांवे असलेल्या स्वीय प्रपंजी खात्यामधील अखर्चित रक्कम दिनांक ३०.०६.२०१६ पर्यंत आराखड्यांतर्गत मूलभूत सुविधा निर्माण करण्यासाठी खर्च करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक -१७६/२०१५/कोषा प्र-५ दिनांक २७.७.२०१५ अन्वये तसेच महालेखापाल कार्यालयाचे पत्र क्रमांक TM/ Ch.२/ PLA/General/२०१५-१६/४८९, दिनांक १७.०७.२०१५ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७२८१४३५३५५५१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Mugdha Nitin Dhuri

Digitally signed by Mugdha Nitin Dhuri
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Mugdha Nitin Dhuri
Date: 2015.07.28 14:38:22 +05'30'

**मु.नि.धुरी**
उप सचिव

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
३. विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती.
४. जिल्हाधिकारी, बुलढाणा.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, बुलढाणा.
६. वित्त विभाग (व्यय-८)/(अर्थ-१६)/(कोषा.प्र.-५), मंत्रालय, मुंबई.
७. नियोजन विभाग, का.१४२४, मंत्रालय, मुंबई.
८. निवड नस्ती/का-१४४४, मंत्रालय, मुंबई.

***********